टाकले पाहिजे. त्यासाठी चिखलाचे लहान लहान गोळे करून त्यात खत मिसळविण्यात आले. व हे गोळे भाताच्या ओळीत टाकून पायाने चिखलात दाबण्यात आले.

त्यासंबंधी नंतर तुलनात्मक प्रयोग करण्यात आला. हेक्टरी ६० किलो नायट्रेट फेकून व गोळा पद्धतीने देण्यात आले. तेव्हा फेकून टाकलेल्या खताचे हेक्टरी उत्पादन ५·८ टन आले व गोळा पद्धतीने दिलेल्या खताचे उत्पादन ८ टन आले. येथल्या अभियांत्रिकी विभागाने जमिनीत खत खोल टाकता येईल अशा तऱ्हेचे यंत्र शोधून काढले आहे. तसेच युरियासारख्या खताला गंधकाचे आवरण घालून ते पिकाला हळूहळू उपलब्ध होईल यासंबंधीही संशोधन चालू आहे.

अंझोला नावाची शेवाळ शेतात वाढू द्यावयाची व नंतर ती भाताच्या दोन ओळीतील जमितीत तुडवून मिसळावयाची, अशा तऱ्हेचा एक प्रयोग आम्हास पहावयास मिळाला. असे केल्याने भाताला लागणारे नत्र द्रव्य अंझोला शेवाळातून उपलब्ध होते. अशा तऱ्हेने वेगवेगळ्या प्रकारची शेवाळ आणून तिची नत्रद्रव्य निर्माण करण्याची कार्यक्षमता शोधून काढण्याचे संशोधनही येथे चालू आहे.

ज्या ठिकाणी पाण्याची उपलब्धता आहे व जेथे उष्णतामान भातास अनुकूल आहे तेथे वर्षभर भात पिकविता येईल या संबंधीचे तंत्रज्ञान शोधून काढण्यावर येथील शास्त्रज्ञ भर देत आहेत. त्याला त्यांनी ' राईस गार्डन ' किंवा ' भाताचा बगीचा ' असे नाव दिले आहे. ह्या बागेत दर शुक्रवारी भात रोपले जाते व दर सोमवारी ते कापले जाते. त्यासाठी ९० दिवसात तयार होणारी आय–आर ५० ही जात उपयोगात आणली होती.

भात पिकात मिश्रपिके घेण्यासंबंधीचे संशोधनही उपयुक्त वाटले. फिलीपिन्स मध्ये हळव्या भात शेतीत भाताच्या ६ ओळी सोडून मधल्या जागेत मका लावला जातो. तर तैवानमध्ये मधल्या रांगेत कोबीचे पीक घेतले जाते. भातानंतर पिकाच्या पेरपालटीरवही संशोधन चालले आहे.

लहान शेतकऱ्यांना परवडू शकतील अशी औजारे ह्यानी तयार केली आहेत. चार लीखंडी पिंपे फोडून त्यांना ऐकमेकांना जोडून त्यांनी पवनचक्की बनविली आहे ही पवनचक्की बाजूच्या नाल्यातून पंपाच्या सहाय्याने पाणी काढू शकते. भातात आंतर मशागत करण्यासाठी लहान आकाराचे पॉवर टिलर्स येथे बनविले असून त्यांचे आराखडे भात पिकविणाऱ्या देशाला पुरविले जातात.

फिलीपिन्सच्या कृषि मंत्रालयाबरोबर ही संस्था सहकार्य करून भाताच्या उत्पादन वाढीचे अनेक कार्यक्रम हाती घेते. ' मसागना ९५ " हा असाच एक कार्यक्रम आहे.' ' हेक्टरी ९९ कबान भात पिकवून फिलीपिन्सची सुबत्ता वाढवू या ' हा त्याचा अर्थ आहे. कबान म्हणजे ५० किलोग्राम. फिलीपिन्सचे भाताचे हेक्टरी

उत्पादन १५ कबान आहे हे वाढवून ९९ कबान करण्याचा राष्ट्रव्यापी कार्यक्रम चालू आहे. शेतकऱ्यांचे प्रशिक्षण करणे, चांगल्या खताचा व बियाण्याचा पुरवठा, बँकेतून पतपुरवठा, प्रात्यक्षिके असा कार्यक्रम आखण्यात या आंतरराष्ट्रीय भात संशोधन संस्थेने पुढाकार घेतला आहे.

पुढच्या ५० वर्षात जगाची लोकसंख्या दुप्पटीने वाढणार असून ती सुमारे ६०० कोटीवर जाईल. त्यासाठी भाताचे उत्पादन ३० टक्क्यानी वाढवावे लागेल. नाहीतर अन्नाची मोठी समस्या निर्माण होईल; असे येथल्या शास्त्रज्ञांचे म्हणणे आहे. त्यासाठी अधिक उत्पादन देणाऱ्या भाताची सर्वत्र लागवड होणे, एका मागून एक अशी वर्षभर सतत पिके घेणे व ज्या त्या हवामानात व जमिनीस अनुकूल होतील अशा भाताच्या लागवडीच्या पद्धती अनुसरणे हाच त्यावर उपाय आहे. आंतरराष्ट्रीय भात संशोधन केन्द्राने निर्माण केलेल्या आय–आर–८ सारख्या जातीनी भात उत्पादनात क्रांती घडवून आणली. परंतु ह्या जाती लहान शेतकऱ्यांत अद्यापही जाऊन पोहोचल्या नाहीत. त्या जाती कशा नेता येतील व त्याचे उत्पादन कसे वाढविता येईल या दिशेने ह्या संस्थेने संशोधन चालू आहे.

सिलांग, कव्हीते

१ ऑक्टोबर १९८०

---